**शासन सेवेत नेमणूक करताना उमेदवाराचे चारित्र्य व पूर्वचारित्र्य याची पडताळणी करण्याबाबत साक्षांकनाचा सुधारित नमुना विहित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक: चारित्र्य-२११७ /प्र.क्र.४८३/२०१७/१६-अ**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २८ ऑगस्ट, २०१७

**संदर्भ** : १) शासन परिपत्रक,राजकीय व सेवा विभाग,क्रमांक : १७२४/३ दि. २०/१०/१९४८
२) शासनपरिपत्रक,साप्रवि क्रमांक व्हीसीए-१०६०/डी,दि.२७/९/१९६०
३) शासन परिपत्रक,साप्रवि,क्रमांक व्हीसीए १०६८/डी-१, दि. १०/५/१९६८
४) शासन निर्णय,साप्रवि क्र.व्हीसीए-१०८८/सी.आर.३६/१६ अ, दि.१९/११/१९९०
५) शासन निर्णय क्र. चापअ १००८/ प्र.क्र. २१४/०८/१६-अ, दि.९.१.२००९
६) केंद्र शासन कार्मिक व प्रशिक्षण विभागाचे कार्यालयीन ज्ञापन क्र. १८०११/२(S) /२०१६ ESTT (B) दि. ३० जून २०१६

**प्रस्तावना :-**

प्रचलित पध्दतीनुसार शासन सेवेत नियुक्ती करण्यापूर्वी उमेदवारांचे चारित्र्य व पूर्वचारित्र्य याची तपासणी करुन ते सदोष नाही याची खात्री विविध प्राधिका-यांकडून जसे पोलिस आयुक्त /जिल्हादंडाधिकारी/पोलिस अधिक्षक यांचे स्तरावरुन करण्यात येते.

२. उमेदवारांचे चारित्र्य व पूर्व चारित्र्य पडताळणी करण्याच्या कार्यवाहीमध्ये प्रशासकीय विलंब टाळण्यासाठी केंद्र शासनाने दिनांक ३०.६.२०१६ च्या कार्यालयीन ज्ञापनान्वये सूचना निर्गमित करण्यात आल्या असून साक्षांकन नमुन्यामध्ये सुधारणा सुचविलेली आहे. राज्य शासनाने सदर सुधारणांचा अवलंब करावा, अशा केंद्र शासनाच्या सूचना आहेत. त्यामुळे चारित्र्य व पूर्वचारित्र्य पडताळणी प्रकियेमध्ये विलंब टाळण्यासाठी केंद्र शासनाच्या धर्तीवर साक्षांकन नमुन्यामध्ये सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

१. या शासन निर्णयायासोबत सुधारित साक्षांकन नमुना जोडण्यात येत असून उमेदवारांनी निवड झाल्यानंतर स्वयंसाक्षांकित साक्षांकन नमुना सादर केल्यानंतर नियुक्ती प्राधिका-यानी तात्पुरते नियुक्तीपत्र निर्गमित करावे.
२. निवड यादी जाहिर झाल्यानंतर सदर निवड यादी ज्या दिनांकास संबंधीत नियुक्ती प्राधिकारी यांना प्राप्त होईल त्या दिनांकापासून संबंधित नियुक्ती प्राधिकारी यांनी कोणत्याही परिस्थितीत संबंधित उमेदवारांना तीन महिन्याच्या आत नियुक्ती पत्र निर्गमित करावे.
३. नियुक्ती प्राधिका-याने शासन सेवेत पात्र उमेदवारांना नियुक्ती देतेवेळी उमेदवाराचे चारित्र्य व पूर्वचारित्र्य यांची तपासणी ६ महिन्याचे आत करणे आवश्यक आहे. नियुक्ती पत्र देण्यापूर्वी संबंधित पोलिस स्टेशनकडून चारित्र्य व पूर्वचारित्र्य याचा अहवाल प्राप्त करुन घेण्याची कार्यवाही सुरु करावी.
४. उमेदवाराने सादर केलेली माहिती असत्य आल्याचे आढळून आल्यास तात्पुरते नियुक्तीपत्र रद्दबादल करुन भारतीय दंडसंहितेनुसार फौजदारी कारवाई तसेच शासन सेवेत कायमस्वरुपी अपात्र ठरविण्यात येईल, अशी अट नियुक्ती प्राधिका-यांने तात्पुरत्या नियुक्तीपत्रात विहित करणे आवश्यक राहील.

५. उमेदवाराची नियुक्तीपश्चात चारित्र्य पडताळणीबाबतची कार्यवाही सहा महिन्याचे आत करणे आवश्यक आहे. चारित्र्य व पूर्वचारित्र्य पडताळणी अहवाल समाधानकारक असल्यास तात्पुरते नियुक्तीपत्र कायमस्वरुपी नियुक्तीस पात्र ठरेल.

६. सुधारित सूचनांप्रमाणे चारित्र्य व पूर्व चारित्र्य पडताळणी अहवाल संबंधित पोलिस स्टेशनकडून ३ महिन्यात प्राप्त न झाल्यास विहित कालावधीत उक्त अहवाल प्राप्त करुन घेण्यासाठी पोलिस महासंचालक यांना सदर प्रकरणी ३ महिन्याच्या अवधीत प्रलंबित कार्यवाही संबंधितांकडून पूर्ण करुन घेण्याबाबत कळविण्यात यावे.

७. सुधारित नमुन्यामध्ये उमेदवाराचा आधार कार्ड क्रमांक, पॅन कार्ड क्रमांक (Pan Card Number) तसेच उमेदवाराच्या कुटुंबातील सदस्य परदेशात अध्ययन करीत असल्यास अथवा राहत असल्यास त्याबाबतची माहिती समाविष्ट करणे अनिवार्य राहील.

८. ज्या प्रकरणी नियुक्ती प्राधिकारी यांचे मत असेल की, उमेदवारांची नियुक्ती संवेदनशिल पदावर करावयाची आहे किंवा ज्या प्रकरणी सुरक्षिततेच्या दृष्टीकोनातून नियुक्तीपूर्व सखोल पडताळणीची आवश्यकता आहे, अशा प्रकरणी चारित्र्य पडताळणी केल्यानंतरच नियुक्ती देण्यात यावी. परंतू अशा प्रकरणी सूट द्यावयाची असल्यास संबंधित प्रशासकीय विभागांनी संपूर्ण समर्थनासह प्रस्ताव सादर केल्यानंतर त्याबाबत सामान्य प्रशासन विभागाकडून विचार करण्यात येईल.

९. एखाद्या कारणामुळे सहा महिन्यापेक्षा जास्त कालावधी लागत असल्यास त्याबाबत वरीष्ठांकडून एक महिन्याचा कालावधी वाढवून घेणे आवश्यक राहिल. परंतु विहित कालावधीत नियुक्ती पश्चात चारित्र्य पडताळणी करून घेण्याची जबाबदारी संबंधित नियुक्ती प्राधिकारी/विभागप्रमुख व संबंधित उमेदवार यांची राहील.

सर्व मंत्रालयीन विभागांना विनंती करण्यात येते की, त्यांनी वरील सुधारणेनुसार तयार करण्यात आलेला सुधारित साक्षांकन नमुना त्यांच्या अधिपत्याखालील कार्यालय प्रमुख / विभाग प्रमुख यांच्या निदर्शनास आणावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०८२८१६१८३४२८०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Tikaram Waman Karpate

Digitally signed by Tikaram Waman Karpate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c97a9d6b23c34fddbfe8f6f6189c08328de56af131faf7d6c0a149c3a4cf1436, cn=Tikaram Waman Karpate
Date: 2017.08.28 16:13:36 +05'30'

(टि.वा.करपते)
उपसचिव,सामान्य प्रशासन विभाग

**प्रति,**

१. मा.विरोधी पक्षनेता, विधानपरिषद/विधानसभा, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई-३२,
२. सर्व सन्माननीय विधानपरिषद/विधानसभा व संसद सदस्य, महाराष्ट्र राज्य,
३. मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई -४०० ०३५,
४. मा. मुख्यमंत्र्यांचे सचिव,मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
५. सर्व मा. मंत्री /मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
६. मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,
७. शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव /प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
८. प्रधान सचिव,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय (विधानपरिषद),विधानभवन, मुंबई -४०० ०३२,

९. प्रधान सचिव,महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय ( विधानसभा), विधानभवन, मुंबई -४०० ०३२,
१०. सचिव, राज्य निवडणूक आयोग, मुंबई -४०० ०३२,
११. सचिव, राज्य माहिती आयोग, मुंबई -४०० ०३२,
१२. प्रबंधक, मा. उच्च न्यायालय, (मूळ न्याय शाखा), मुंबई, औरंगाबाद, नागपूर,
१३. प्रबंधक, मा.उच्च न्यायालय, (अपील शाखा), मुंबई, औरंगाबाद, नागपूर,
१४. प्रबंधक, मा.महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई, औरंगाबाद, नागपूर,
१५. प्रबंधक, मा. लोक आयुक्त व मा. उप लोक आयुक्त, मुंबई,
१६. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
१७. सरकारी वकील, मा.उच्च न्यायालय, मूळ शाखा व अपील शाखा, मुंबई, औरंगाबाद, नागपूर,
१८. सरकारी वकील, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधिकरण, मुंबई, औरंगाबाद, नागपूर,,
१९. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई,
२०. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर,
२१. महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई - ४०० ०३२ (५ प्रती),

**त्यांना विनंती की, प्रस्तुत शासन परिपत्रक सर्व प्रसिध्दी माध्यमातून प्रसिध्द करण्यात यावे.**

२२. सर्व विभागीय आयुक्त/सर्व जिल्हाधिकारी, महाराष्ट्र राज्य
२३. सर्व विभागातील उप सचिव (आस्था), मंत्रालय, मुंबई -४०० ०३२,
२४. सर्व महानगरपालिकांचे आयुक्त,
२५. सर्व मुख्याधिकारी, नगरपरिषदा/नगरपालिका,
२६. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
२७. राज्यातील सर्व महामंडळे, मंडळे आणि सार्वजनिक उपक्रम यांचे व्यवस्थापकीय संचालक,
२८. विधीमंडळ ग्रंथालय, विधानभवन, मुंबई (१० प्रती),
२९. सर्व मान्यताप्राप्त राजकीय पक्षांची मध्यवर्ती कार्यालये (प्रत्येकी ५ प्रती),
३०. निवड नस्ती/कार्या. १६-अ, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

## साक्षांकन नमुना /ATTESTATION FORM

| | | |
|---|---|---|
| अलिकडील छायाचित्राची प्रत<br><br>(५ सेंटीमीटर x ७ सेंटीमीटर) या आकाराच्या छायांकित प्रतीवर सही करुन ती जोडावी.<br><br>Affix signed Passport size<br><br>(5 cmsx 7cms)<br><br>Approx copy of recent photograph | १ | **"ताकीद"**<br><br>या साक्षांकन नमुन्यामध्ये खोटी माहिती दिल्यास किंवा कोणतीही वस्तुस्थितीनिदर्शक माहिती दडवून ठेवल्यास त्याला अपात्र ठरविण्यात येईल, आणि कोणत्याही राज्य शासकीय सेवेसाठी कायम अपात्र ठरेल.<br><br>**WARNING.-**<br><br>The furnishing of false information or suppression of any factual information in the Attestation Form would be disqualification and is likely to render the candidate unfit for employment under the Government. |
| | २ | हा नमुना पूर्ण भरुन सादर केल्यानंतर, जर उमेदवाराला स्थानबध्द केले,अटक करण्यात आले, खटला चालविण्यात आला, हद्दपार करण्यात आले, दंडासाठी सिध्दपराध ठरला, मनाई केली दोषमुक्त इ. केले तर हा तपशील ज्यांना साक्षांकन नमुना अलिकडेच पाठविण्यात आला होता त्या प्राधिका-याला तात्काळ कळविला पाहिजे, असे करण्यात कसूर केल्यास वस्तुस्थितीनिदर्शक माहिती दडवून ठेवल्याचे समजण्यात येईल.<br><br>If detained , arrested prosecuted, bound down, fines convicted, debarred, acquitted etc. subsequent to the completion and submission of this form, the details should be communicated, immediately, to the the authorities to whom the Attestation Form has been sent early, failing which it will be deemed to be a suppression of factual information |
| | ३. | कोणत्याही व्यक्तीने सेवेमध्ये असताना साक्षांकन नमुन्यात खोटी माहिती सादर केली किंवा वास्तविक माहिती दडवून ठेवल्याचे निदर्शनास आले तर ती व्यक्ती तिची सेवा समाप्त करण्यास पात्र ठरेल. |

| | | |
|---|---|---|
| | | If the fact that false information has been furnished or that there has been suppression of any factual information in the Attestation Form comes to notice at any time, during the service of a person, his services would be liable to be terminated. |

| | | | |
|---|---|---|---|
| १ | पूर्ण नाव (ठळक अक्षरात), टोपण नाव (असल्यास) त्यासह (जर तुम्ही तुमच्या नावात किंवा आडनावामध्ये केव्हाही बदल केला असल्यास किंवा त्यातील काही वगळले असल्यास कृपया तसे दर्शवावे.)<br><br>Name in full [in block capitals] with aliases, if any [Please indicate if you have added or dropped in any stage, any part of your name or surname]. | आडनाव<br>Surname | नाव<br>Name |
| २ | सध्याचा संपूर्ण पत्ता (म्हणजेच गाव, ठाणे व जिल्हा किंवा घर क्रमांक,गल्ली /मार्ग/रस्ता आणि शहर).<br><br>Present address in full [i.e. Village, Thana and District or House Number,Lane/Street/ Road and Town]. | | |

| | | | |
|---|---|---|---|
| ३<br>(क) | घरचा पुर्ण पत्ता (म्हणजेच गाव, ठाणे आणि जिल्हा किंवा घर क्रमांक,गल्ली/मार्ग/रस्ता आणि शहर आणि जिल्हा मुख्यालयाचे नाव).<br><br>[a] Home address in full [i.e. Village, Thana and District or House Number, Lane/ Street/Road and Town and name of District Headquarters]. | | |
| (ख) | मूळचे पाकिस्तान/ बांग्लादेशचे ( फार पूर्वी पूर्व पाकिस्तानचे ) रहिवासी असल्यास, त्या देशातील पत्ता आणि भारतीय संघराज्यामध्ये स्थलांतरीत झाल्याचा दिनांक.<br><br>[b] If originally a resident of Pakistan/ Bangladesh (erstwhile East Pakistan) the address in that country and the date of migration to the Indian Union. | | |
| ४ | आधार कार्ड क्रमांक ( उपलब्ध असल्यास)<br><br>Adhar Card No.(if available) | | |
| ५ | पॅन क्रमांक(उपलब्ध असल्यास)<br><br>PAN NO. (if available) | | |
| ६ | राष्ट्रीयत्व<br><br>Nationality | | |

| | | | |
|---|---|---|---|
| ७ | (अ) जन्मदिनांक<br><br>a. Date of Birth<br><br>(ब) सध्याचे वय<br><br>b. Present age<br><br>(क) मॅट्रीकमध्ये असतानाचे वय<br><br>c. Age at Matriculation | | |
| ८ | (अ) जन्मस्थान, ज्या जिल्हा आणि राज्यात स्थित आहे तो जिल्हा व राज्य<br><br>[a] Place of birth,District and State in which situated.<br><br>(ब) तुमचा जिल्हा आणि राज्य<br><br>[b] District and State to which you belong ?<br><br>क) तुमच्या वडिलांचा मुळ जिल्हा व राज्य<br><br>c) District and State to which your father originally belong ? | | |
| ९ | (अ) तुमचा धर्म<br><br>a. Your Religion<br><br>(ब) तूम्ही अनुसूचित जाती/अनुसूचित जमाती/ इतर मागासवर्गीय उमेदवार आहात काय ? (असल्यास होय/नाही.)<br><br>b. Are you a member of a scheduled caste/scheduled Tribe /other Backward Classes?<br><br>Answer Yes/No | | |

१० मागील ५ वर्षात एकावेळी एक वर्षाहून अधिक काळापर्यंत ज्या ठिकाणी तुम्ही राहिला असाल त्या ठिकाणाचा तपशील . (निवासाच्या कालावधीसह) परदेशात राहिले असल्यास, (पाकिस्तानासह), वयाच्या २१ वर्ष पूर्ण झाल्यानंतर ज्या ठिकाणी एक वर्षाहून अधिक काळपर्यंत राहिला असेल तर त्या ठिकाणाचा तपशील द्यावा.

Particulars of places [with periods of residences] where you have resided for more than one year at a time during the proceeding five years. In case of stay abroad [including Pakistan] particulars of all places where you have resided for more than one year after attaining the age of 21 years should be given.

| पासून<br>From | पर्यंत<br>To | संपूर्ण निवासी पत्ता (म्हणजेच गाव,ठाणे व जिल्हा किंवा घर क्रमांक गल्ली/रस्ता/मार्ग आणि शहर)<br>Residential Address in full [i.e Village, Thana and District or House Number, Lane/ Street/ Road and Town]. | जिल्हा मुख्यालयाचे नाव मागील रक्यानात नमूद केलेले ठिकाण<br>Name of the District Head Quarter of the place mentioned in preceding Column |
|---|---|---|---|
| | | | |

११

| | नाव (पूर्ण नाव आणि टोपन नाव असल्यास त्यासह)<br>Name in full & aliases if any | राष्ट्रीयत्व (जन्माने किंवा अधिवासाने)<br>Nationality ( By birth & or by domicile) | जन्मस्थान<br>Place of birth | व्यवसाय, नोकरी करीत असल्यास त्याचे पदनाम व कार्यालयाचा पत्ता Occupation if employed give designation & official address | सध्याचा पत्र व्यवहाराचा पत्ता (मागील पत्ता बदलेला असल्यास)<br>Present postal address(if dead vive last address) | कायमचा निवासाचा पत्ता<br>permanent Home address |
|---|---|---|---|---|---|---|
| अ) वडील | | | | | | |

| | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|
| | [a] Father | | | | | | |
| | ब) आई<br>[b] Mother | | | | | | |
| | (क)<br>पती/पत्नी<br>[c] Spouse | | | | | | |

१२ मुलगा/मुलगी बाहेर देशात शिक्षणाकरिता अथवा राहण्यास गेले असल्यास त्याबाबतची माहिती

Information to be furnished with regard to sons and / or daughters in case they are studying/ living in a foreign country.

| नाव<br>Name | राष्ट्रीयत्व जन्माने किंवा अधिवासाने<br>Nationality by birth & or by domicile | जन्मस्थान<br>place of birth | अध्ययनासाठी / निवासासाठी ज्या देशात गेला आहे तेथील पूर्ण पत्ता<br>Country in which studying /living with full address | मागील स्तंभात उल्लेख केलेल्या परदेशात केव्हापासून शिक्षण घेत आहात / राहात आहात तो दिनांक<br>Date from which studying/living in the country mentioned in the previous column |
|---|---|---|---|---|
| | | | | |

१३ शैक्षणिक अर्हता, वयाच्या १५ व्या वर्षापासून शालेय आणि महाविद्यालयीन शिक्षणाचे वर्ष व ठिकाण यासह शैक्षणिक अर्हता दर्शवावी.

Educational Qualification showing places of education with years in Schools and colleges since 15 years of age.

| शाळा/महाविद्यालयाचे नाव व (पूर्ण पत्यासह) Name of School/College with full address | प्रवेशाचा दिनांक Date of entering | शाळा सोडल्याचा दिनांक Date of leaving | परीक्षा उत्तीर्ण झाल्याचे वर्ष Examination passed |
|---|---|---|---|
| | | | |

१४ (अ) तुम्ही केंद्र किंवा राज्य शासन किंवा निमशासकीय किंवा शासनवत नियम किंवा स्वायत्त संस्था किंवा सार्वजनिक क्षेत्र उपक्रम किंवा खाजगी संस्था किंवा संस्था या अंतर्गत पद धारण केले आहे काय किंवा कोणत्याही वेळी नियुक्ती करण्यात आली आहे काय? तसे असल्यास नियुक्तीच्या दिनांकासह संपूर्ण माहिती द्यावी.

(a) Are you holding or have any time held an appointment under Central or State Government or a semi Government or a quasi Government body or an autonomous body or a public sector undertaking or a private firm or institution ? If so, give full particulars with date of employment up to date

| कालावधी Period | | | | |
|---|---|---|---|---|
| पासून From | पर्यंत To | धारण केलेले पद (सेवायोजनाची वित्तलब्धी व स्वरूप) Designation emoluments& nature of employment | नियोक्त्याचे पूर्ण नाव व पत्ता Full name & address of employer | नियोक्त्याचे पूर्ण नाव व पत्ता Reasons for leaving previous service |

१४ (ब) जर यापूर्वीची नोकरी भारत सरकार/राज्य शासन/ भारत सरकार किंवा राज्य शासन यांच्या मालकीच्या किंवा नियंत्रणाखालील उपक्रम / स्वायत्त संस्था/ विद्यापीठ, स्थानिकमंडळ याअंतर्गत असेल जर तुम्ही केंद्रीय नागरी सेवा (तात्पुरती सेवा ) याच्या नियम १९६५ च्या नियम ५ अन्वये एका

| | |
|---|---|
| (b) | महिन्याची नोटीस देऊन नोकरी सोडली असेल तर तुमच्या विरूध्द किंवा तशाच तत्सम नियमान्वये कोणतीही शिस्तभंगाची कार्यवाही करण्यात आली असेल किंवा तुम्ही सेवा समाप्तीची नोटीस दिली त्यावेळेस किंवा त्यानंतरच्या दिनांकास किंवा तुमची सेवा प्रत्यक्षात समाप्त करण्यापूर्वी या बाबी विषयी तुमचे स्पष्टीकरण देण्यासाठी बोलावण्यात आले होते का?<br><br>If the previous employment was under the Government of India/a State Government /undertaking owned or controlled by the Government of India or a State Government/and Autonomous body/University/Local body .<br><br>If you had left service on giving a months notice under Rule 5 of the Central Civil Services (Temporary Service) Rules 1965,or any similar corressponding rules,were any disciplinary proceedings framed against you or had you been called upon to explain your conduct in any matter at the time you gave notice of termination of service or at a subsequent dates before your service actually terminated? |

खालील रकान्यात होय किंवा नाही स्पष्ट नमुद करावे, काहीही नमुद न केल्यास होय असे समजून नियुक्ती आदेश निर्गमित करण्यात येणार नाही.

| | | | |
|---|---|---|---|
| १५ (१) | अ<br><br>a | तुम्हाला आतापर्यंत कधीही स्थानबध्द ठेवले होते का?<br><br>Have you ever been kept under detention? | होय / नाही<br><br>Yes/No |
| | ब<br><br>b | तुम्हाला आतापर्यंत कधीही अटक करण्यात आले होते का?<br><br>Have you ever been arrested? | होय / नाही<br><br>Yes/No |
| | क<br><br>c | तुमच्या विरूध्द खटला दाखल करण्यात आला आहे का? (म्हणजे कोणत्याही न्यायालयात तुमच्या विरूध्द फौजदारी खटल्याबाबत दोषारोप पत्र दाखल करण्यात आले होते का?<br><br>Have you ever been prosecuted ? | होय / नाही<br><br>Yes/No |
| | ड | हा साक्षांकन नमुना भरतेवेळी कोणत्याही न्यायालयात, आपल्या विरूध्द फौजदारी खटला प्रकरण प्रलंबित आहे का? | होय / नाही |

| | | | |
|---|---|---|---|
| | d | Is any criminal case pending against you in any court of Law at the time or filing up this Attestation form? | Yes/No |
| | इ<br><br>e | तुम्हाला न्यायालयाकडून कोणत्याही अपराधाबददल आतापर्यंत सिध्द अपराधी ठरविण्यात आले आहे का ?<br><br>Have you ever been convicted by a court of law for any office? | होय / नाही<br><br>Yes/No |
| | फ<br><br>f | कोणत्याही शासन किंवा अन्य याअंतर्गत कोणतेही प्रशिक्षण / संस्था यांनी कार्यमुक्त केले / काढून टाकले / काढले आहे का ?<br><br>Whether discharged/expelled /withdrawn from any training institution under the Government or otherwise? | होय / नाही<br><br>Yes/No |
| | ज<br><br>g | तुम्हाला कोणत्याही विद्यापीठ / कोणतेही इतर शैक्षणिक प्राधिकरण / संस्था ,यांनी काढून टाकले आहे का?<br><br>Have you ever been rusticated by any University or any other educational authority / Institution ? | होय / नाही<br><br>Yes/No |
| | च<br><br>h | तुम्हाला कोणत्याही लोकसेवा आयोग/ कर्मचारी निवड आयोग यांनी त्यांच्या कोणत्याही परीक्षा / निवडीसाठी कधी प्रतिरोधित /अनर्ह ठरविले आहे काय?<br><br>Have you ever been debarred / disqualified by any Public Services Commission/staff Selection Commission for any of its examination / selection? | होय / नाही<br><br>Yes/No |
| | दोन | वर नमूद केलेल्या प्रश्नापैकी जर कोणत्याही एका प्रश्नाचे उत्तर -"होय" असेल तर हा साक्षांकन नमुना भरतेवेळी सदर खटला/ अटक/ स्थानबध्दता/ दंड/ दोषसिध्दी/ शिक्षादेश/शिक्षा इत्यादी, आणि किंवा न्यायालय / विद्यापिठ / शैक्षणिक प्राधिकरण इत्यादी ठिकाणी प्रलंबित असलेल्या प्रकरणाचे स्वरूप यांचा संपूर्ण तपशील द्यावा. | |

<table>
<tr><td></td><td></td><td>If the answer to any of the above mentioned question is 'Yes' give full particulars of the case / arrest / detention/ fine / conviction/ sentence/ punishment etc. and or the nature of the case pending in the Court / University / Educational Authority etc., at the time of filling up this attestation form.</td></tr>
<tr><td rowspan="2">टीप<br><br>NOTES</td><td>एक<br><br>i</td><td>तसेच या साक्षांकन नमुन्याच्या सुरूवातीस असलेला - "इशारा" देखील कृपया पहावा.<br><br>Please also see the 'WARNING' at the top of this Attestation Form</td></tr>
<tr><td>दोन<br><br>ii</td><td>प्रत्येक प्रश्नाचे विनिर्दिष्ट उत्तर यथास्थिती होय/नाही मध्ये देण्यात यावे .<br><br>Specific answers to each of the questions should be given by striking out' Yes' or' No' as the case may be</td></tr>
<tr><td>१६<br><br>16</td><td colspan="2"><table><tr><td>तुमच्या निवास भागातील दोन जबाबदार व्यक्तींची नावे किंवा तुम्हाला ओळखणा-या दोन संदर्भी व्यक्तींची नाव:</td><td>१) -------------<br><br>२) -------------</td></tr><tr><td>Name of two responsible persons of your<br><br>locality or two references to whom you are known.</td><td>1) -------------<br><br>2) -------------</td></tr></table></td></tr>
</table>

## शपथपत्र

मी असे प्रमाणित करतो/करते की, माझी पूर्वगामी दिलेली माहिती ही अचूक आणि माझ्या संपूर्ण माहितीप्रमाणे व विश्वासाप्रमाणे खरी आहे.

मी पूर्णपणे जाणीवपूर्वक सांगतो / सांगते की, हा नमुना भरताना खोटी माहिती पुरविली किंवा महत्वाची माहिती दडवून ठेवली तर या प्राधिकरणाला माझे नियुक्तीपत्र रद्द करण्याचा पूर्ण अधिकार आहे, आणि त्याचा परिणाम म्हणून मी देखील फौजदारी / नागरी / वैध कारवाईस पात्र आहे.

शासना अंतर्गत नियुक्ती होण्यासाठी माझ्या पात्रतेला हानी पोहोचेल अशा परिस्थितीची मला जाणीव नाही.

उमेदवाराची सही

दिनांक

ठिकाण

## DECLARATION

I certify that the foregoing information is correct and complete to the best of my knowledge and belief ,I am fully aware that by providing false information or suppressing material information while filling this form, the authorities have full right to terminate my appointment letter and I am also liable for appropriate criminal/civil/legal action as a consequence.

I am not aware of any circumstances which might impair my fitness for employment under Government.

Signature of the Candidate

Date --------------------

Place --------------------

(कार्यालयाने भरावयाचे)   TO BE FILLED BY THE OFFICE

१. नियुक्ती प्राधिका-याचे नाव, पदनाम आणि संपूर्ण पत्ता   --------------------

Name , Designation and full address of the appointment authority.  -----------

२. विचारात घेतलेले उमेदवाराचे पद.   -------------------------

Post for  which the candidate is being considered.     ------------------